**भारतीय खेळ प्राधिकरणाच्या धर्तीवर राज्यात क्रीडा मार्गदर्शकांची श्रेणी निर्माण करुन सदरची पदे बाह्यस्त्रोत यंत्रणेद्वारे भरण्यासाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना...**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संक्रीआ २१०७/प्र.क्र.१९७/भाग-१/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २० जून, २०२३

वाचा- १. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.संक्रीआ २१०७/प्र.क्र.१९७/क्रीयुसे-२, दि.१५ जुलै, २०१०
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.संक्रीआ २१०७/प्र.क्र.१९७/क्रीयुसे-२ दि.०९ डिसेंबर, २०१०
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पदनि २०१३/र.क्र.११२/१३/वित्तीय सुधारणा-१, दि.०२ डिसेंबर, २०१३
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.संक्रीआ २१०७/प्र.क्र.१९७/भाग-१/ क्रीयुसे-२,दि.२३ ऑगस्ट, २०१९

**प्रस्तावना:-**

राज्यातील उदयोन्मुख क्रीडापटूंमधून आंतरराष्ट्रीय पदकविजेते खेळाडू घडविण्याच्या दृष्टीने योजना राबविण्यासाठी क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर १५३ क्रीडा मार्गदर्शकांची श्रेणीनिहाय पदे मानधन तत्त्वावर निर्माण करण्याचा निर्णय दिनांक १५ जुलै, २०१० च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. त्यानुसार संदर्भाधीन दिनांक ०९ डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयान्वये क्रीडा व युवक सेवा संचालनालयाच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या १५३ क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती व इतर बाबी संदर्भातील नियमावली प्रसिद्ध करण्यात आलेली होती. तथापि सदर कार्यपद्धतीनुसार कार्यवाही करावयाची झाल्यास क्रीडा मार्गदर्शकांच्या नियुक्तीस अडचणी निर्माण होत असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यामुळे संदर्भाधीन दिनांक ०९ डिसेंबर, २०१० च्या शासन निर्णयानुसार प्रसिद्ध करण्यात आलेली नियमावली अधिक्रमित करून सुधारित नियमावली संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२३/०८/२०१९ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केली आहे. तथापि, सदर शासन निर्णयान्वये, बाह्यस्त्रोत यंत्रणेद्वारे नियुक्त करावयाच्या क्रीडा मार्गदर्शकांना देय मानधन अल्प असल्याने चांगल्या दर्जाचे क्रीडा मार्गदर्शक उपलब्ध होत नसल्याचे आढळून आले आहे, त्यामुळे क्रीडा विकासाच्या दृष्टीने व उच्च गुणवत्तेचे क्रीडा मार्गदर्शक उपलब्ध होण्यासाठी भारतीय खेळ प्राधिकरणाच्या (साईच्या) धर्तीवर राज्यात क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शक अशी श्रेणी निर्माण करुन सुधारीत वाढीव दराने मानधन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासाठी संदर्भाधीन क्र.४ येथील दि.२३/०८/२०१९ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती करण्यासाठी शासनाने आता खालील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

राज्यातील उदयोन्मुख क्रीडापटूंमधून ऑलिम्पिक, राष्ट्रकुल तसेच इतर तत्सम आंतरराष्ट्रीय क्रीडा स्पर्धांमधून पदक विजेते खेळाडू घडविण्याच्या कामी क्रीडा मार्गदर्शकांची अत्यंत महत्त्वाची भूमिका आहे. सदर क्रीडा मार्गदर्शकांच्या नियुक्तीसाठी भारतीय खेळ प्राधिकरणाच्या (साई) धर्तीवर राज्यात खालीलप्रमाणे क्रीडा मार्गदर्शकांची श्रेणी नव्याने निर्माण करुन, बाह्यस्त्रोत यंत्रणेद्वारे सदर क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे-

| अ.क्र. | पदनाम | दरमहा मानधन | भरावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | क्रीडा मार्गदर्शक | रु.६०,०००/- | ५३ |
| २ | सहायक क्रीडा मार्गदर्शक | रु.४०,०००/- | १०० |

२. उपरोक्त पदे भरण्यासाठी सोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील सुधारित नियमावलीस शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदरची पदे सोबतच्या "परिशिष्ट-ब" मध्ये नमूद केल्यानुसार भरण्याची कार्यवाही करावी.

३. सदरच्या क्रीडा मार्गदर्शकांची मानधनावरील नियुक्ती करण्याकरिता येणारा खर्च मागणी क्रमांक ई-३,२२०४- क्रीडा व युवक सेवा, १०४-क्रीडा व खेळ, (०९) खेळाडूंना शिष्यवृत्त्या व पुरस्कार, (०९) (१४) मानधन तत्वावर खास प्रशिक्षकांची नेमणूक करणे (२२०४-५४४८) (कार्यक्रम), ३६ सहायक अनुदाने (वेतन) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णयान्वये संदर्भाधीन क्रमांक ४ येथील, दि.२३ ऑगस्ट, २०१९ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौ. संदर्भ क्र.२०३/व्यय-५, दि.२७/०२/२०२३ व नियोजन विभागाचा अनौ. संदर्भ क्र.१८२/१४७१, दि.२५/०४/२०२३ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६२०११४७३६६०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=b52de42797ba0b88d4615daa9566ad8fa49d5063795020 8576d69ab9dba313a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=345A2816550FE595955B31526C8E1A31863F6F9DC 898D91E4543436BE8B73FDA, cn=SUNIL SURYAKANT HANJE
Date: 2023.06.20 15:11:32 +05'30'

**( सुनिल हंजे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव कार्यालय, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (क्रीडा व युवक कल्याण), यांचे खाजगी सचिव

४. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
११.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१५.निवडनस्ती, क्रीयुसे-२.

शासन निर्णय क्र. संकीआ-२१०७/प्र.क्र.१९७/भाग-१/क्रीयुसे-२, दिनांक: २० जून, २०२३ सोबतचे

*"परिशिष्ट-अ"*

**मानधनावरील क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती व इतर बाबीसंदर्भातील नियमावली**

नियम- १:- **शीर्षक:** या नियमांना मानधनावरील क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती व इतर बाबी संदर्भातील सुधारीत नियमावली, २०२३ असे संबोधण्यात यावे.

नियम-२:- **उद्दिष्ट:** ऑलिम्पिक, राष्ट्रकुल तसेच तत्सम आंतरराष्ट्रीय स्पर्धामध्ये पदक विजेते खेळाडू घडविण्याच्या दृष्टीने क्रीडा मार्गदर्शकांच्या नियुक्तीसाठी योजना राबविणे.

नियम ३:- **मानधन:-** सदर शासन निर्णयान्वये नियुक्त करावयाच्या क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शक यांना खालील नमूद केल्यानुसार मानधन अदा करण्यात येईल-

| अ.क्र. | पदनाम | दरमहा मानधन | भरावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | क्रीडा मार्गदर्शक | रु.६०,०००/- | ५३ |
| २ | सहायक क्रीडा मार्गदर्शक | रु.४०,०००/- | १०० |

नियम ४:- **शैक्षणिक अर्हता, वयोमर्यादा व क्रीडा विषयक अर्हता**

नियम ४.१:- **शैक्षणिक अर्हता-**

१. किमान इयत्ता १२ वी (एच.एस.सी) उत्तीर्ण आणि

२. संगणकाचे ज्ञान (MS-CIT).

नियम ४.२:- **वयोमर्यादा-**

क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शक पदासाठी किमान २५ व कमाल ५५ वर्षे.

नियम ४.३:- **क्रीडा मार्गदर्शक पदासाठी आवश्यक क्रीडा विषयक अर्हता:-**

१. एन. आय.एस. (पदविका) **किंवा,**

२. आंतरराष्ट्रीय पदक प्राप्त खेळाडू (ऑलिम्पिक गेम्स/ एशियन गेम्स्/ कॉमनवेल्थ गेम्स/जागतिक अजिंक्यपद/जागतिक चषक/ युथ ऑलिम्पिक/ॲफ्रो-एशियन गेम्स/ युथ कॉमनवेल्थ गेम्स/ युथ एशियन गेम्स / युवा जागतिक अजिंक्यपद स्पर्धा / जागतिक चषक (युवा)/आशियाई अजिंक्यपद स्पर्धा /आशियाई चषक /राष्ट्रकुल अजिंक्यपद स्पर्धा (वरिष्ठ गट)

उपरोक्त क्रमनिहाय वरिष्ठ अर्हता प्राप्त उमेदवारास नियुक्तीसाठी प्राधान्य देण्यात येईल.

नियम ४.४- **सहायक क्रीडा मार्गदर्शक पदासाठी आवश्यक क्रीडा विषयक अर्हता:-**

१. एन. आय.एस. (पदविका) **किंवा,**

२. आंतरराष्ट्रीय पदक प्राप्त खेळाडू (ऑलिम्पिक गेम्स्/ एशियन गेम्स् / कॉमनवेल्थ गेम्स/ जागतिक अजिंक्यपद /जागतिक चषक /युथ ऑलिम्पिक /ॲफ्रो-एशियन गेम्स / युथ कॉमनवेल्थ गेम्स /युथ एशियन गेम्स / युवा जागतिक अजिंक्यपद स्पर्धा / जागतिक चषक (युवा) /आशियाई अजिंक्यपद स्पर्धा /आशियाई चषक /राष्ट्रकुल अजिंक्यपद स्पर्धा (वरिष्ठ गट) **किंवा,**

३. उपरोक्त अ. क्र. २ वरील आंतरराष्ट्रीय स्पर्धेमध्ये सहभागी झालेला व वरिष्ठ राष्ट्रीय स्पर्धेत किमान तीन वेळा सहभागी झालेला खेळाडू **किंवा,**

४. राष्ट्रीय क्रीडा पुरस्कार प्राप्त व्यक्ती किंवा राज्य क्रीडा पुरस्कार प्राप्त व्यक्ती **किंवा,**

५. एकविध खेळाच्या आंतरराष्ट्रीय संघटनेमार्फत आयोजित त्या त्या खेळाचे १ ते ४ लेवल (प्रशिक्षक) पैकी किमान दोन लेवल पूर्ण केलेला खेळाडू **किंवा,**

६. शिवछत्रपती राज्य पुरस्कार प्राप्त खेळाडू **किंवा,**

७. वरिष्ठ राष्ट्रीय स्पर्धेत पदक प्राप्त खेळाडू **किंवा,**

८. अखिल भारतीय आंतर विद्यापीठ स्पर्धेत पदक प्राप्त खेळाडू **किंवा,**

९. पश्चिम विभागीय आंतर विद्यापीठ स्पर्धेत तीन वेळा सहभाग घेऊन किमान एका स्पर्धेत पदक प्राप्त खेळाडू **किंवा,**

१०. वरिष्ठ राष्ट्रीय स्पर्धेत सहभाग व वरिष्ठ राज्य स्पर्धेत तीन वेळा सहभाग घेऊन किमान एका स्पर्धेत पदक प्राप्त केलेला खेळाडू

उपरोक्त क्रमनिहाय वरिष्ठ अर्हता प्राप्त उमेदवारास नियुक्तीसाठी प्राधान्य देण्यात येईल.

**नियम ५:- नियुक्त करावयाच्या पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-**

१. संबंधित खेळाचे प्रशिक्षण केंद्र विभागीय/जिल्हा क्रीडा संकुलाच्या ठिकाणी सुरु करणे व प्रशिक्षण केंद्रावर मार्गदर्शन करणे.

२. जिल्हा / विभागीय / राज्य स्तरीय शालेय / संघटनेच्या स्पर्धांच्या ठिकाणी उपस्थित राहुन जिल्हयातील उद्योन्मुख गुणी खेळाडूंची निवड यादी तयार करणे.

३. क्रीडा प्रशिक्षण केंद्राचा खेळाडू निहाय मासिक अहवाल जिल्हा क्रीडा अधिकारी/क्रीडा व युवक सेवा संचालनालयाकडे सादर करणे.

४. संबधित जिल्हयामध्ये क्रीडा नैपुण्य चाचण्यांचे आयोजन करणे.

५. शासनाच्या इतर क्रीडा स्पर्धा, शिबिरे व क्रीडा विषयक उपक्रमात सहकार्य करणे.

६. प्रशिक्षण केंद्रात प्रशिक्षण घेणाऱ्या खेळाडूंचे दैनिक हजेरीपत्रक व मासिक प्रगती दर्शक अहवाल नोंदवहीत नोंद करून ती नोंदवही संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना दरमहा सादर करणे.

७. विभाग/जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राकरिता खरेदी करावयाच्या साहित्याबाबत संबंधित विभागीय उपसंचालक/जिल्हा क्रीडा अधिकारी यांना सहकार्य करणे.

८. जिल्हयाच्या ठिकाणच्या शाळांमधील मुख्याध्यापक, क्रीडा शिक्षक तसेच क्रीडा संघटक यांच्याशी संपर्क साधून जास्तीत जास्त खेळाडू प्रशिक्षण केंद्राचा लाभ घेतील या दृष्टीने प्रयत्न करणे.

**नियम ६:- नियुक्त करावयाच्या पदांसाठी, नियुक्तीच्या अटी व शर्ती:-**

१. क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांची पदे चार वर्षाच्या कालावधीसाठी बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत भरण्यात येतील. त्यासाठी निविदा/EOI प्रसिद्ध करण्यात यावी.

२. कराराचा कालावधी चार वर्षाचा राहील.

३. कराराचा कालावधी चार वर्षाचा असला तरी नियुक्त क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांच्या कामाचे मूल्यमापन त्याची नियुक्ती झालेल्या दिनांकानंतर प्रतिवर्षी करण्यात येईल.

४. क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांच्या कामाचे मूल्यमापन १०० गुणांच्या सूचीनुसार करण्यात येईल. ज्या क्रीडा मार्गदर्शकाचे गुणांकन ६० पेक्षा कमी होईल त्याच्या सेवा १ वर्षानंतर समाप्त करण्यात येतील. रिक्त झालेल्या पदांवर बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत निवड करण्यात आलेल्या अर्हता प्राप्त क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांची निवड करता येईल.

५. ६० पेक्षा जास्त गुणांकन प्राप्त करणाऱ्या क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांची सेवा पुढील एक वर्षासाठी वाढविण्याचे अधिकार आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राहतील. अशा प्रकारे सदर मार्गदर्शकांच्या सेवा जास्तीत जास्त ३ वेळा वाढविता येतील. मात्र चार वर्षानंतर संबंधित क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांची सेवा करार संपुष्टात आणून समाप्त करण्यात येतील.

६. दर ४ वर्षांनी पुनः निविदा काढून बाह्यस्त्रोत यंत्रणेमार्फत क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांची निवड करण्याकरिता प्रक्रिया राबविण्यात यावी.

७. जिल्हयामधील सर्वाधिक लोकप्रिय व अधिकाधिक खेळल्या जाणाऱ्या खेळाकरिता त्या-त्या जिल्हयातील स्थानिक खेळाडू उमेदवारांची नियुक्ती करण्यास प्राधान्य राहील व संबंधित क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकाचे कार्यक्षेत्र तो संपूर्ण जिल्हा राहील. तथापि, गरजेनुसार इतर जिल्ह्यांमध्ये रिक्त पदावर त्यांच्या नियुक्तीचे अधिकार आयुक्त, क्रीडा यांना राहतील.

८. निवड झालेले क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शक हे पूर्ण वेळ शासनाच्या विभागीय/जिल्हा/तालुका: क्रीडा संकुलातील क्रीडा केंद्रात प्रशिक्षण देतील.

९. सदर पदाकरिता राज्य शासकीय/निमशासकीय कर्मचारी वगळून इतर अर्हताप्राप्त इतर व्यक्ती अर्ज करु शकतील.

१०. कामाचे तास निश्चित करुन देण्याचे अधिकार आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना राहतील.

११. विभागस्तरावर नियुक्त केलेल्या समिती मार्फत क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांनी केलेल्या कामगिरीचे मुल्यांकन प्रत्येक वर्षानंतर करण्यात येईल. अशा मूल्यांकना अंती ज्या क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांची कामगिरी समाधानकारक असेल त्यांची नियुक्ती पुढे चालु ठेवण्याबाबत व ज्या मार्गदर्शकांची कामगिरी असमाधानकारक असेल त्यांची नियुक्ती संपुष्टात आणण्याची शिफारस समिती संचालनालयास सादर करेल.

**नियम ७:- नियुक्त करावयाच्या पदांसाठीची निवड प्रक्रिया-**

"आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी नियुक्तीसाठीची जाहिरात वर्तमानपत्रात निविदा/ई.ओ.आय. द्वारे प्रसिद्ध करावी. सदर प्रक्रीयेद्वारे प्राप्त अर्जांची छाननी व त्यासंदर्भातील एजन्सी नियुक्तीची कार्यवाही आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समितीचे गठन करुन करण्यात यावी-

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २ | सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे | सदस्य |
| ३ | विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा या संवर्गातील २ अधिकारी (आयुक्त, क्रीडा यांच्या मान्यतेने) | सदस्य |
| ४ | उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा,मुख्यालय, पुणे | सदस्य सचिव |

क्रीडा मार्गदर्शकांची सदर नियुक्ती ही मानधन तत्वावर व बाह्यस्त्रोत यंत्रणेची कार्यपद्धती अनुसरुन करण्यात यावी.

निवड प्रक्रीयेसाठी मुल्यांकन १०० गुणांमध्ये खालील प्रमाणे करण्यात येईल.

| अ.क्र. | बाब | | गुण |
|---|---|---|---|
| १ | खेळ निहाय कौशल्य चाचणी (७५ गुणांची विभागणी-प्रशिक्षण कौशल्य ५० गुण, वैयक्तिक कौशल्य १५ गुण व वैयक्तिक फिटनेस १० गुण) (किमान ४० गुण आवश्यक) | | ७५ |
| २ | शैक्षणिक अर्हता | | २५ |
| | पदव्युत्तर पदवी | ०५ | |
| | पदवी | ०५ | |
| | इ.१२ वी | ०५ | |
| | अनुभव | ०५ | |
| | संगणकाचे ज्ञान (MS-CIT) | ०५ | |
| | एकूण गुण | | १०० |

टिप १-: नियम क्र. ४.३ व नियम क्र.४.४ मधील क्रीडा अर्हता धारण करणाऱ्या उमेदवारांपैकी, उपरोक्त १०० गुणांपैकी जास्तीत जास्त गुण प्राप्त करणारा उमेदवार खेळनिहाय नियुक्तीस पात्र राहिल.

**नियम ७.१.:-** खेळनिहाय कौशल्य चाचणीची नियमावली, अटी, शर्ती व इतर अनुषंगीक कार्यवाही इत्यादी विहित पध्दती निश्चित करण्याचा अधिकारी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा ज्यांना राहील.

**नियम-८:- क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शक पदांच्या मूल्यमापनासाठी समिती :-**

क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शक पदावरील नियुक्तीसाठी व नियुक्ती पुढे चालु ठेवण्यासाठी खालील प्रमाणे निवड समिती गठित करण्यात येत आहे. सदर मार्गदर्शकांच्या नियुक्तीनंतर एक वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्यावर त्यांच्या क्रीडा कामगिरीचे मूल्यमापन सदर समितीमार्फ़त दुसऱ्या वर्षी व त्यानंतर प्रतिवर्षी करण्यात येईल. सदर समिती खालील प्रमाणे आहे-

| | | |
|---|---|---|
| १ | संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा | अध्यक्ष |
| २ | संबंधित विभागातील तालुका क्रीडा अधिकारी | सदस्य |
| ३ | संबंधित खेळाचा क्रीडा मार्गदर्शक | सदस्य |
| ४ | महाराष्ट्र ऑलिम्पिक संघटनेने नियुक्त केलेला प्रतिनिधी/ राज्य, राष्ट्रीय पुरस्कारार्थी/ आंतरराष्ट्रीय खेळाडू | सदस्य |
| ५ | जिल्हा क्रीडा अधिकारी | सदस्य सचिव |

टिप- वरील अ.क्र.२ व ३ येथील सदस्यांची नियुक्ती संबंधित विभागीय उपसंचालक करतील. अ.क्र.४ येथील सदस्याची नियुक्ती महाराष्ट्र ऑलिम्पिक असोसिएशनद्वारे करण्यात आली नसल्यास सदर सदस्याची नियुक्ती संबंधित विभागीय उपसंचालक करतील. याबाबत काही तक्रारी असल्यास आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांनी सुनावणी घ्यावी. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांचा निर्णय अंतीम राहिल.

**नियम ९:- क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शक पदावरील उमेदवारांच्या मुल्यांकनाचे निकष-**

क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शक यांच्या तात्पुरत्या स्वरुपातील नियुक्तीचा एक वर्षाचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर सदर क्रीडा मार्गदर्शकांच्या कामगिरीचे मूल्यांकन करण्याकरिता निकष खालील प्रमाणे आहेत:-

१. संबंधित क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शक ज्या क्रीडा प्रकाराचे प्रशिक्षण देत असेल त्या क्रीडा प्रकारातील खेळाडूंनी वर्षभरात केलेल्या विविध स्तरावरील क्रीडा कामगिरीच्या

आधारे त्या क्रीडा मार्गदर्शकाला गुण देण्यात यावेत. या गुणांच्या आधारे त्या क्रीडा मार्गदर्शकाची सेवा पुढील वर्षाकरिता कायम ठेवण्याचा निर्णय घेण्यात येईल..

२. क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शक यांना त्यांनी घडवलेल्या खेळाडूंच्या विविध स्तरावरील क्रीडा स्पर्धेतील कामगिरीकरिता पुढील प्रमाणे गुण देण्यात येतील :-

| अ.क्र. | स्पर्धेचा स्तर | प्रती खेळाडू सहभागाकरिता गुण | प्रती खेळाडू प्राविण्याकरिता गुण |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा स्तर | २ | ३ |
| २ | विभागीय स्तर | ५ | ३ |
| ३ | राज्य स्तर | १० | ३ |
| ४ | राष्ट्रीय स्तर | १५ | ३ |
| ५ | आंतरराष्ट्रीय स्तर | २० | ३ |

३. सांघिक खेळाकरिता क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकाने वर्षभरात किमान ५० गुण संपादित करणे आवश्यक राहील.

४. वैयक्तिक खेळाकरिता क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकाने वर्षभरात किमान ३० गुण संपादित करणे आवश्यक राहील.

५. किमान गुण संपादित न करणाऱ्या क्रीडा मार्गदर्शक/सहायक क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती संपुष्टात आणण्यात येईल.

६. क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांच्या मूल्यांकनासाठी क्रीडा व युवक सेवा संचालनालयातील क्रीडा प्रशिक्षण कक्षाकडे दरमहा सर्व क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांनी त्यांच्याकडे प्रशिक्षण घेत असलेल्या प्रशिक्षणार्थ्यांची यादी सादर करावी.

७. क्रीडा मार्गदर्शक/ सहायक क्रीडा मार्गदर्शकांचे मुल्यांकन हे क्रीडा व युवक सेवा संचालनालयातील क्रीडा प्रशिक्षण कक्षाकडून जिल्हा क्रीडा अधिकारी यांच्या मार्फत प्राप्त होणाऱ्या वार्षिक अहवालाच्या आधारे करण्यात येईल.

**नियम- १०:- नियम शिथिल करणे/बदल करणे-**

या नियमावली मधील कोणताही नियम शिथिल करणे, त्यात अंशत: बदल करणे किंवा तो पुर्ण पणे रद्द करणे आणि नवीन नियम समाविष्ट करणे याबाबतचे सर्व अधिकार शासनास राहतील.

**नियम- ११:- सदरच्या क्रीडा मार्गदर्शकांच्या नियुक्त्या खालील नमूद खेळांसाठी अनुज्ञेय असतील-**

१. मैदानी खेळ (ॲथलेटिक्स) २. जलतरण, ३. सायकलींग, ४. हॉकी, ५. फुटबॉल, ६. टेबल टेनिस, ७. बॅडमिंटन, ८. व्हॉलीबॉल, ९ बास्केटबॉल, १० हॅण्डबॉल, ११. आर्चरी, १२.

जिम्नॅस्टिक, १३. बॉक्सींग, १४. कुस्ती १५ वेटलिफ्टींग, १६. शुटींग, **१७ ज्युदो**, १८. कबड्डी, १९. खो-खो, २०. तायक्वांदो, २१ मल्लखांब, २२. तलवारबाजी, २३. लॉनटेनिस.

**नियम- १२:- जिल्हा निहाय संख्या-**

जिल्हानिहाय नियुक्त करावयाच्या क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शकांची संख्या सोबतच्या “परिशिष्ट-ब” मध्ये दर्शविली आहे. सदर पदसंख्येच्या मर्यादेत क्रीडा मार्गदर्शकांची नियुक्ती करण्याची जबाबदारी आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांची राहील.

अपरिहार्य व निकडीच्या परिस्थितीत, क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शकांच्या जिल्हा स्तरावरील संख्येत बदल करण्याचा अधिकार शासनास राहील.

-----------------------

शासन निर्णय क्र. संकीआ-२१०७/प्र.क्र.१९७/भाग-१/क्रीयुसे-२, दिनांक: २० जून, २०२३ सोबतचे

***“परिशिष्ट-ब”***

क्रीडा मार्गदर्शक व सहायक क्रीडा मार्गदर्शक पदांचे जिल्हानिहाय वर्गीकरण

| अ.क्र. | जिल्हा | क्रीडा मार्गदर्शकांची संख्या | सहायक क्रीडा मार्गदर्शकांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | मुंबई शहर | ०३ | ०२ |
| २ | मुंबई उपनगर | ०१ | ०३ |
| ३ | पालघर | ०१ | ०३ |
| ४ | ठाणे | ०१ | ०३ |
| ५ | रायगड | ०१ | ०३ |
| ६ | नाशिक | ०३ | ०२ |
| ७ | धुळे | ०१ | ०३ |
| ८ | नंदुरबार | ०१ | ०३ |
| ९ | जळगाव | ०१ | ०३ |
| १० | पुणे | ०३ | ०३ |
| ११ | अहमदनगर | ०१ | ०३ |
| १२ | सोलापूर | ०१ | ०३ |
| १३ | कोल्हापूर | ०३ | ०२ |
| १४ | सांगली | ०१ | ०३ |
| १५ | सातारा | ०१ | ०३ |
| १६ | रत्नागिरी | ०१ | ०३ |
| १७ | सिंधुदुर्ग | ०१ | ०३ |
| १८ | औरंगाबाद | ०३ | ०२ |

| | | | |
|---|---|---|---|
| १९ | जालना | ०१ | ०३ |
| २० | परभणी | ०१ | ०३ |
| २१ | हिंगोली | ०१ | ०३ |
| २२ | बीड | ०१ | ०३ |
| २३ | लातूर | ०३ | ०२ |
| २४ | नांदेड | ०१ | ०३ |
| २५ | उस्मानाबाद | ०१ | ०३ |
| २६ | नागपूर | ०३ | ०२ |
| २७ | वर्धा | ०१ | ०३ |
| २८ | भंडारा | ०१ | ०३ |
| २९ | गोंदिया | ०१ | ०३ |
| ३० | गडचिरोली | ०१ | ०३ |
| ३१ | चंद्रपूर | ०१ | ०३ |
| ३२ | अमरावती | ०३ | ०२ |
| ३३ | अकोला | ०२ | ०२ |
| ३४ | वाशिम | ०१ | ०३ |
| ३५ | यवतमाळ | ०१ | ०३ |
| ३६ | बुलढाणा | ०१ | ०३ |
| एकूण | | ५३ | १०० |